**मराठी भाषा भवन, महाराष्ट्र, मुंबई या प्रकल्पाकरिताच्या आराखडे मंजूरीचे शुल्क अदा करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**मराठी भाषा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मभाभ २०२४/प्र.क्र.५१/भाषा-१**

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २४ जून, २०२४.

**वाचा:-**

(१) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्रमांक मभाभ २०२१/प्र.क्र.४८/भाषा-१, दि.०६.०४.२०२२

(२) शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, क्रमांक मभाभ २०२३/ प्र.क्र.१०७/भाषा-१, दि.१५.१२.२०२३

(३) शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, क्रमांक मभाभ २०२१/प्र.क्र.४८/भाषा-१, दि.०१.०३.२०२४

(४) कार्यकारी अभियंता, एकात्मिकृत घटक (सा. बां.) विभाग, मुंबई यांचे पत्र क्र. जा.क्र.- काअ/ एघवि/३६१४, दि.१४.०६.२०२४

**प्रस्तावना**

गिरगांव महसूली विभागातील भूखंड क्र.१७३६ येथे मराठी भाषा भवन, महाराष्ट्र, मुंबई ही इमारत उभारण्यात येणार आहे. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, दि.१२.०७.२०२१ अन्वये मराठी भाषा भवन, महाराष्ट्र, मुंबई या इमारतीच्या बांधकामाकरिता गिरगांव महसूल विभागातील भूखंड क्र.१७३६ मधील अंदाजे २०८५ चौ.मी. इतका भूखंड मराठी भाषा विभागास हस्तांतरित करण्यात आला आहे.

तद्नंतर मराठी भाषा भवनासंबंधी मा. मंत्री, मराठी भाषा विभाग यांच्या अध्यक्षतेखाली वेळोवेळी झालेल्या बैठकांमध्ये झालेल्या निर्णयांनुसार वास्तुविशारद यांनी प्रकल्पाचे आराखडे सुधारीत केले. मा.मंत्रिमंडळाच्या दि.१९.०४.२०२३ रोजीच्या बैठकीमध्ये शालेय शिक्षण विभागाच्या अधिनस्त कार्यालयाची इमारत व मराठी भाषा विभागाची मराठी भाषा भवन मुख्य केंद्र अशी संयुक्त भव्य इमारत उभारण्याकरिता भूखंडाचे एकत्रीकरण करण्यास व त्याकरिता सादर केलेल्या सुधारीत आराखड्यांना मान्यता देण्यात आली.

मा. मंत्रिमंडळाच्या दि.१९.०४.२०२३ रोजीच्या बैठकीत झालेल्या निर्णयास अनुसरुन शासन निर्णय, महसूल व वन विभाग, दि.२३.०८.२०२३ अन्वये मराठी भाषा भवन, मुख्य केंद्र करिता गिरगांव महसूली विभागातील भूकर क्र.१७३६ सुधारीत क्षेत्र ३७७० चौ.मी. चा मराठी भाषा विभाग व शालेय शिक्षण विभाग यांच्यामार्फत संयुक्तरित्या विकास करण्याकरिता ना-हरकत देण्यात आली आहे. जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांनी दि.०१.०९.२०२३ रोजीच्या आदेशान्वये सदर भूखंड मराठी भाषा विभागास हस्तांतरीत केला आहे.

तद्नंतर मा. मंत्रिमंडळाच्या दि.२९.११.२०२३ रोजीच्या बैठकीमध्ये मराठी भाषा विभाग व उच्च व तंत्र शिक्षण विभागाकडील भूखंडाबाबत अंशत: अदलाबदल करुन भूखंडाच्या पुढील बाजूस मराठी भाषा भवन व मागील बाजूस सावित्रीबाई फुले वसतिगृह अशा दोन स्वतंत्र इमारतीच्या बांधकाम करण्यास, मराठी भाषा भवन या इमारतीच्या सुधारीत आराखड्यांना, सदर इमारतीच्या बांधकामाकरिता सार्वजनिक बांधकाम विभाग या

अभिकरणाची नियुक्ती करण्यास आणि त्यांच्यामार्फत नवीन निविदा प्रक्रिया करण्यास व अन्य इतर बाबींना मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, दि.१५.१२.२०२३ निर्गमित करण्यात आला आहे

संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, दि.०१.०३.२०२४ अन्वये मराठी भाषा भवन, महाराष्ट्र, मुंबई या प्रकल्पाच्या बांधकामाकरिता रु.१५०.१४ कोटी इतक्या रकमेची नव्याने प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

मराठी भाषा भवन, महाराष्ट्र, मुंबई या प्रकल्पाच्या सुधारीत आराखड्यांना बृहन्मुंबई महानगरपालिकेची मान्यता घेण्याची कार्यवाही कार्यकारी अभियंता, एकात्मिकृत घटक (सा. बां.) विभाग, मुंबई (बांधकाम अभिकरण) व वास्तूविशारद यांच्याकडून सुरु आहे. कार्यकारी अभियंता, एकात्मिकृत घटक (सा. बां.) विभाग, मुंबई यांनी संदर्भाधीन क्र.३ येथील दि.१४.०६.२०२४ रोजीच्या प्रस्तावान्वये मराठी भाषा भवन, महाराष्ट्र, मुंबई या प्रकल्पाच्या अनुषंगाने प्रस्तावित नकाशे / भूखंडाचे एकत्रीकरण व उपविभागणी (Proposed lay out / amalgamation sub division of property) यासाठीचे रु.३,२४,५००/- इतके शुल्क बृहन्मुंबई महानगरपालिका यांना अदा करण्याकरिता निधी वितरण करण्याची विनंती केली होती.

त्यास अनुसरुन कार्यकारी अभियंता, एकात्मिकृत घटक (सा.बां.) विभाग, मुंबई यांना रु.३,२४,५००/- इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मराठी भाषा भवन, महाराष्ट्र, मुंबई या प्रकल्पाचे प्रस्तावित नकाशे / भूखंडाचे एकत्रीकरण व उपविभागणी (Proposed lay out / amalgamation sub division of property) याकरिता बृहन्मुंबई महानगरपालिका यांना शुल्क अदा करण्याकरिता रु. ३,२४,५००/- (अक्षरी रुपये तीन लक्ष चोवीस हजार पाचशे फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

सदर खर्च विभागाच्या मागणी क्रमांक झेडएफ ४, मुख्य लेखाशीर्ष ४०५९- सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, (०१) कार्यालयीन इमारती, (०५१) बांधकाम, (००)(००) (०१) मराठी भाषा संशोधन, विकास व सांस्कृतिक केंद्र स्थापन करणे, ५३, मोठी बांधकामे, संगणक संकेतांक (४०५९२५३२) या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर निधी आहरीत व संवितरीत करण्याकरिता कार्यकारी अभियंता, एकात्मिकृत घटक (सा.बां.) विभाग, बांधकाम भवन, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी आणि अधीक्षक अभियंता, एकात्मिकृत घटक (सा.बां.) विभाग, बांधकाम भवन, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०२३/विनिमय, भाग-२, दि.१७.०४.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका- १९७८ (भाग पहिला), उप विभाग-तीन, अनुक्रमांक-४, परिच्छेद क्रमांक २७(२) नुसार प्रशासनिक विभागाला प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६२४११५१३६६१३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MARUTI LAXMAN LHAYAKAR

Digitally signed by MARUTI LAXMAN LHAYAKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, 2.5.4.20=8b602cc35713bc737e58d3d44ef592bf297a5d88ada3a0b76b51280ec6081313, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=48E018A56D88390B5D52CAF1AC6184FB1588E15FEBCF18C68DECE92BF667529B, cn=MARUTI LAXMAN LHAYAKAR
Date: 2024.06.24 12:05:03 +05'30'

**( मा.ल.ल्हायकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल भवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मंत्री (मराठी भाषा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्ष नेता विधानपरिषद/ विधानसभा, विधान भवन, मुंबई.
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
८. महालेखापाल, महाराष्ट्र- १ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर.
९. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर.
१०. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई.
११. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई.
१२. प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई.
१३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय मुंबई.
१४. अपर मुख्य सचिव, मराठी भाषा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१७. अधीक्षक अभियंता/कार्यकारी अभियंता, एकात्मिकृत घटक (सा. बां.) विभाग, मुंबई
१८. सर्व अवर सचिव/ कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९. निवड नस्ती (भाषा-१)